नागपूर येथील उर्दू घराच्या अंतर्गत कामासाठीच्या वर्ष २०२४-२५ मध्ये अनुदान वितरित करण्याबाबत.

# महाराष्ट्रशासन
## अल्पसंख्याक विकास विभाग
## शासननिर्णयक्रमांकः नाऊघ २०२२/प्र.क्र.१४२/का.४

मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
तारीख: २९.०३.२०२५

**वाचा-**

१) शासन निर्णय, अल्पसंख्याक विकास विभाग क्रमांक नाऊघ २०२२/प्र.क्र.१४२/का.४, दि.२९.०३.२०२३.
२) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्रमांक:अर्थसं- २०२४/प्रक्र. ३४/अर्थ-३, दि.१ एप्रिल, २०२४
३) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्रमांक:अर्थसं- २०२३/प्रक्र. ८०/अर्थ-३, दि.२५ जुलै, २०२४
४) वित्त विभाग, क्रमांक:अर्थसं- २०२४/प्र.क्र.८०/ अर्थ-३, दि.१७ मार्च, २०२५
५) जिल्हा नियोजन अधिकारी, जिल्हाधिकारी, नागपूर यांचे पत्र क्रमांकः अविवि/का-११/ख.क्र.११०,११२ उर्दू घर निधी मागणी/२५/२०२४-२५, दि.०६.०१.२०२५.

**प्रस्तावना-**

खसरा, क्रमांक ११० व ११२, मौजा-इंदोरा, सिध्दार्थनगर, टेका, नागपूर येथील उर्दू घराच्या अंतर्गत कामासाठीच्या रु.४,५३,००७१८/- (रुपये चार कोटी त्रेप्पन लाख सातशे अठरा मात्र) इतक्या किंमतीच्या अंदाजपत्रकास संदर्भ क्र.१ येथील शासन निर्णय दि.२९.०३.२०२३ अन्वये प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात आलेली आहे. आता प्र.जिल्हा सह आयुक्त, नगर प्रशासन, जिल्हाधिकारी, नागपूर यांनी संदर्भ क्र.५ येथील पत्रान्वये नागपूर उर्दू घराच्या अंतर्गत कामासाठी अनुदान वितरित करण्याची मागणी सादर केली आहे. त्यास अनुसरुन नागपूर उर्दू घराच्या अंतर्गत कामासाठी सन २०२४-२५ या आर्थिक वर्षात उपलब्ध निधी मधून अनुदान वितरण करण्याची बाब शासनाच्या विचाराधिन आहे.

**शासन निर्णय-**

वित्त विभागाने संदर्भ क्र.२ आणि ३ अन्वये दिलेली मान्यता तसेच वित्त विभागाने अर्थसंकल्पीय प्रणालीवर उपलब्ध करुन दिलेल्या निधीमधून नागपूर उर्दू घराच्या अंतर्गत कामासाठी रु.७३,१५,४५१/- (रुपये त्र्याहत्तर लाख पंधरा हजार चारशे एक्कावन्न मात्र) इतका निधी जिल्हाधिकारी, नागपूर यांना वितरित करण्यास तसेच जिल्हाधिकारी, नागपूर यांना वितरित करण्यात आलेला निधी नागपूर सुधार प्रन्यास यांना वितरित करण्यास याद्वारे मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

२. जिल्हाधिकारी, नागपूर यांनी सदर निधीच्या विनियोगाबाबचे उपयोगिता प्रमाणपत्र विहित नमून्यात शासनास तसेच महालेखाकार कार्यालयास सादर करावे. जिल्हाधिकारी, नागपूर यांनी सदर खर्च विहित मर्यादेत राहील याची दक्षता घ्यावी.

३. वरीलप्रमाणे अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीवर उपलब्ध असलेला निधी कोषागारातून आहरित करण्यापूर्वी तसेच खर्च करतांना राज्य शासनाची कार्य नियमावली, वित्तीय नियमावली, अर्थसंकल्पीय नियम पुस्तिकेतील तरतूदी व सर्व अटी/शर्तीचे पालन करणे ही जबाबदारी जिल्हाधिकारी, नागपूर यांची राहील.

४. सदर प्रयोजनासाठी होणारा खर्च "मागणी क्रमांक झेडई-१ २२३५-सामाजिक सुरक्षा व कल्याण - २००- इतर कार्यक्रम-राज्य योजनांतर्गत योजना- (००)-(००)(१८) - उर्दू घरासाठी सहाय्यक अनुदाने (२२३५ ए ५५२) ३१, सहायक अनुदान (कार्यक्रम)" या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकावा व तो सन २०२४-२५ या आर्थिक वर्षात मंजूर केलेल्या तरतुदीतून भागविण्यात यावा.

५. हा शासन निर्णय, नियोजन विभाग अनौ. संदर्भ क्र.८८/१४७१, दि.२१.०२.२०२५ आणि वित्त विभाग अनौ.संदर्भ क्रमांक ८९/ २०२५/ व्यय-१ दि.१८.०३.२०२५ अन्वये प्राप्त मान्यता तसेच शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्रमांक:अर्थसं-२०२४/ प्रक्र. ३४/ अर्थ-३ , दि.१ एप्रिल, २०२४ आणि शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्रमांक:अर्थसं- २०२४/ प्रक्र.८०/ अर्थ-३, दि.२५ जुलै, २०२४ तसेच शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्रमांक:अर्थसं- २०२४/प्र.क्र.८०/ अर्थ-३, दि.१७ मार्च, २०२५ अन्वये प्रशासकीय विभागांना प्राप्त अधिकाराचा वापर करुन निर्गमित करण्यात येत आहे..

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.inया संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२५०३२९१५१६३८६७१४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Digitally signed by MILIND PADMANABH SHENOY
Date: 2025.03.29 15:17:49 +05'30'

**( मिलिंद शेणॉय )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१. महालेखापाल-१/२ ( लेखापरिक्षा / लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, मुंबई / नागपूर,
२. सचिव, अल्पसंख्याक विकास विभाग, मंत्रालय, मुंबई, यांचे स्वीय सहायक,
३. जिल्हाधिकारी, जिल्हाधिकारी, नागपूर,
४. सभापती, नागपूर सुधार प्रन्यास, नागपूर,
५. अधिक्षक अभियंता, नागपूर सुधार प्रन्यास, नागपूर,
६. कार्यकारी अभियंता (उत्तर), नागपूर सुधार प्रन्यास, नागपूर
७. जिल्हा कोषागार अधिकारी, नागपूर,
८. अधीक्षक-नि-कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र राज्य उर्दु साहित्य अकादमी, मुंबई,
९. उप सचिव (अ.वि.वि.), अल्पसंख्याक विकास विभाग, मंत्रालय, मुंबई यांचे स्वीय सहायक,
१०. अवर सचिव/कक्ष अधिकारी (का-७). अल्पसंख्याक विकास विभाग, मंत्रालय, मुंबई,
११. वित्त विभाग (व्यय-१/अर्थ-१४) / नियोजन विभाग (१४७१), मंत्रालय, मुंबई,
१२. निवडनस्ती (का-४)/कार्यासन-४, संग्रहार्थ.